**महाराष्ट्र इन्स्टिट्युट ऑफ हॉटेल मॅनेजमेंट अॅन्ड कॅटरिंग टेक्नालॉजी, सोलापूर या संस्थेची इमारतीच्या हस्तांतरणाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: बैठक २०२३/०२/प्र.क्र.९३/पर्यटन**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०३ एप्रिल, २०२३.

**प्रस्तावना :-**

पर्यटन मंत्रालय, भारत सरकार यांच्या मागदर्शक तत्वानुसार महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने मौजे मजरेवाडी, ता. जि. सोलापूर येथे उपहारगृहे व्यवस्थापन संस्था स्थापन करण्याबाबत केंद्र शासनास प्रस्ताव सादर केला होता. त्यानुसार सदर जागेवर उपहारगृहे व व्यवस्थापन संस्था स्थापन करण्याकरीता मान्यता घेऊन केंद्रशासनाने रु.१२.११ कोटी इतक्या रकमेस मंजूरी प्रदान केलेली आहे. त्यानुसारसार्वजनिक बांधकामविभाग, सोलापूर यांनी सदर इमारतीचे बांधकाम पूर्ण करुन सदर इमारत दि.०५.०१.२०१७ रोजी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाकडे हस्तांतरीत केली आहे.सद्यस्थितीत संपूर्ण प्रशासकीय व तांत्रिक काममहाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ पाहत आहे.

२. प्रथम सदरील कॉलेजमध्ये पदवीका अभ्यासक्रम होता तथापि आता पदवी पर्यंतचा अभ्यासक्रम समाविष्ट करण्यात आलेला आहे.पर्यटन क्षेत्रात युवकांना उद्योजकता व नेतृत्व गुण विकसिक करण्यासाठी आदरातिथ्य क्षेत्रात प्रशिक्षण देऊन रोजगारक्षम करण्याकरीता पर्यटन कौशल्य अभ्यासक्रमाचा समाविष्ट करुन त्यामध्ये होम स्टे, ट्रॅव्हलिंग एजन्सी व टुर गाईड यांचा समावेश आहे. सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पीय भाषणात सदर बाब नमुद केली आहे.

३. महाराष्ट्र इन्स्टिट्युट ऑफ हॉटेल मॅनेजमेंट अॅन्ड कॅटरिंग टेक्नॉलॉजी कॉलेजच्या संदर्भात मा. मंत्री (पर्यटन) यांच्या निर्देशानुसार, प्रधान सचिव (पर्यटन) यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या दि.२७/०२/२०२३ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई यांच्याकडील सोलापुर येथील महाराष्ट्र इन्स्टिट्युट ऑफ हॉटेल मॅनेजमेंट अॅन्ड कॅटरिंग टेक्नॉलॉजी शासकीय संस्था म्हणून कार्यान्वीत करण्याकरीता संचालक, पर्यटन संचालनालय, मुंबईयांना हस्तांतरण करण्याचे प्रस्तावित होते.

**शासन निर्णय :-**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई यांच्याकडील सोलापूर येथील महाराष्ट्र इन्स्टिट्युट ऑफ हॉटेल मॅनेजमेंट अॅन्ड कॅटरिंग टेक्नालॉजी कॉलेजचे संचालक, पर्यटन संचालनालय यांच्याकडे हस्तांतरीत करण्यात येत आहे.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई यांनी सोलापूर येथील महाराष्ट्र इन्स्टिट्युट ऑफ हॉटेल मॅनेजमेंट अॅन्ड कॅटरिंग टेक्नालॉजी कॉलेजची इमारत सुसज्ज करुन संचालक, पर्यटन संचालनालय, मुंबई यांच्याकडे तात्काळ सुपूर्द करावी.
३) सदर संस्था हस्तांतरीत झाल्यानंतर संस्थेचे प्रशासकीय कामकाज व इतर सर्व व्यवहार यापुढे पर्यटन संचालनालयामार्फत हाताळण्यात याव्यात.

४) संचालक, पर्यटन संचालनालय, मुंबई यांनी नॅशनल कौसिंल फॉर हॉटेल मॅनेजमेंट ॲण्ड कॅटरिंग टेक्नॉलॉजी, नवी दिल्ली यांची पदवी अभ्यासक्रमाकरीता मान्यता व इतर आवश्यक त्या परवानग्या प्राप्त करण्याचे अनुषंगाने कार्यवाही करावी.

५) महाराष्ट्र इन्स्टिट्युट ऑफ हॉटेल मॅनेजमेंट ॲन्ड कॅटरिंग टेक्नालॉजी कॉलेज, सोलापूर येथे डिप्लोमा पदवी अभ्यासक्रम सोबत होम स्टे, टुर गाईड इत्यादी ट्रॅव्हल / पर्यटन संबंधित कौशल्य विकास अंतर्गत येणारे अभ्यासक्रम ही सुरु करण्यात येतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०४०३१६२१५६५६२३ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

UJJWALA SANTOSH DANDEKAR

Digitally signed by UJJWALA SANTOSH DANDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=c63ad337cb443baf4ff2dd616156bccf1f2629f47cc9704e8e8523f35b0e6505, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BB0449B3A46260C9CACDAD789E301DD18ABAA6D766D244021239745A6F561B29, cn=UJJWALA SANTOSH DANDEKAR
Date: 2023.12.28 14:49:51 +05'30'

**( उज्ज्वला दांडेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा)मुंबई.
४. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मंत्री (पर्यटन), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ.
८. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. जिल्हाधिकारी, सोलापूर.

**प्रत: प्रधान सचिव यांचे स्वीय सहायक.**